!! संतस्तुत गणराज !!

भगवान श्री गणेश हे सर्वपूज्य, सर्वादिपुज्य दैवत. कोणत्याही मंगलकार्यास आरंभ होणार तो श्री मंगलमूर्तीच्या मंगलमय पूजनाने, वंदनाने किमान स्मरणाने भारतीय संस्कृतीचा हा अलिखीत दंडकच. सगळ्या सामान्यांनीच नव्हे तर महापुरुषांनीही ही मर्यादा सातत्याने पाळली आहे. महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. संतसाहित्याने येथील जनमानसाला अखंड प्रफुल्लीत केले आहे. या सगळ्याच संतांनी आपल्याला ग्रंथांच्या आरंभी केलेली श्रीगणेशवंदना हा एक वेगळाच आनंद विषय आहे. अध्ययनाचा, चिंतनाचा, अनुकरणाचा, आस्वादाचा विषय आहे.

विविध संतांनी केलेल्या गणेशवंदनेचा रसास्वाद घेण्यापूर्वी काही गोष्टी समानतेने पाहता येतील ही समानताच एका वेगळ्या आनंदाचा भाग आहे.

प्रथम महत्वाचा भाग म्हणजे यातील कोणत्याच प्रधान संतांनी तुमच्या माझ्या डोळ्यात परंपरेने रूढ झालेल्या मोरयाच्या रुपाला स्पर्श केलेला नाही. जनमानसात मोरयाची रूढ प्रतिमा म्हणजे पार्वतीपुत्र, शिवनंदन, शिवगणप्रमुख, शंकर वरदान प्रभावाने युक्त देवता. मात्र यातील एकही कथन यथार्थ नाही. प्रसंगोपात्त रीतीने या बाबी त्यांच्या अवतारलीलांचा भाग असला तरी ते वास्तव नाही. ते मोरयाचे स्वरूप नाही. याच कारणाने कोणत्याही संतांनी श्रीगणेशांच्या या शिवपुत्रत्वाचा, पार्वतीनंदनत्वाचा विचार आधारभूत मानलेलाच नाही.

पण मग प्रश्न येतो की जे मोरयाचे स्वरूप इतके मर्यादित नसेल तर ते नेमके आहे तरी कसे? तर गाणपत्य संप्रदायाच्या परमशास्त्रीय भूमिकेनुसार श्रीगणेशांचे स्वरूप आहे ओकररुपत्व, परब्रह्म परमात्म स्वरूप. निर्गुण निराकार सच्चिदानंद परब्रह्म रुपात श्रुतीस्मृतींनी वंदिलेले परमतत्व आहे श्रीगणेश.

सगळ्याच संतांनी याच परब्रह्म परमात्म रूपाचेच वर्णन केले आहे. त्या स्वरूपाचीच आळवणी केली आहे. कारण हे ऑकर रूप परब्रह्मच भारतीय संस्कृतीचे आराध्य तत्व आहे. अन्य सर्व ईश्वर महेश्वरही याच ऑकाराचे अंशरुप आहेत. मात्र परिपूर्ण ऑकार ब्रह्माचे एकात्म वंदन करायचे तर ते श्रीगणेश रुपातच संभव आहे ही सगळ्या संतांची भूमिका आहे. याच कारणाने संतमांदियाळीचे मेरुमणी माऊली ज्ञानेश्वर महाराज सुस्पस्ट शब्दात घोषणा करतात की "देवा तूची गणेशु!"
मंगलाचरण हे या परममंगलाचे आहे. या अनंतकोटीब्रह्मांडनायक परम 'कारणाचे' आहे शिवपार्वती नंदन रूप 'कार्याचे' नाही.

अन्यच मंगलाचरणाचे एक प्रयोजन असते अविघ्नता सिद्धी. कार्यात कोणतेही विघ्न येऊ नये म्हणून विघ्नविनायकाचे वंदन केले जाते. मात्र संतकृतस्तवने अशी नाहीत. कारण अशा स्तवनात प्रीतीपेक्षा भीतीच जास्त असते आणि संतांच्याठायी भीतीचा संबंधच असू शकत नाही. संत अभयाचे स्वरूप हीच वास्तविकता असते. अत: हे मंगलाचरण अविघ्ननाशार्थ नाही तर परब्रह्मवंदन रूपच असते.
हे केवळ शिवपुत्र वंदन नाही म्हणण्याचे एक वेगळ कारण असे की कधीकाळी आपल्या देशात शैव आणि वैष्णव वाद पराकोटीचा तीव्र होता. संत वादाचे नाही तर संवादाचे जनक असतात हे जरी खरे असले तरी श्रीगणेश केवळ शिवपुत्र असते तर वैष्णव, शाक्त, सौर इ. अन्य मार्गीयांनी त्यांच्या आरंभ वंदनात मुद्दाम रस घेतला नसता. मात्र संतसाहित्यात आपणास श्रीगणेशांच्या आरंभ वंदना बाबत सार्वत्रिक एकमत पहावयास मिळते.

बरे हे केवळ आरंभवंदन आहे इतकेच नाही. ज्यावेळी आपण एकेका संतांनी केलेल्या गणेशवंदनेस सविस्तर रीत्या पाहू त्यावेळी आपणास अशा काही अदभुत रचना मिळतील की ज्या आपणास थक्क करतील.

विशेषत: संतशिरोमणी नामदेव महाराज यदुमाणिक, मध्वमुनीश्वर किंवा सरस्वती गंगाधरांच्या रचना पाहिल्या की आपणास मोरयाचे एक आगळंच वैभव ध्यानात येईल.

ही चारही विभूतीमत्वे रुदार्थाने गाणपत्य संप्रदायाची व गणेशोपासक नाहीत. सामान्य विचार करता

श्रीनामदेव महाराज वारकरी, यदुमाणिक नाथसंप्रदायी मध्वमुनीश्वर वैष्णवपंती तर सरस्वती गंगाधर दत्त संप्रदायाचे. मात्र या चारही संतांची अशी कवन रचना उपलब्ध आहे की ज्यामध्ये त्यांनी आपल्याला आराध्य दैवताला श्रीगणेशोपासना रात रुपात वर्णिले आहे.
सामान्यत: कोणत्याही साधकास, उपासकास त्याची उपास्य देवताच सर्वोच्चस्थानी असते. तशी ती असावीही. मात्र त्या आपल्या उपास्याने केलेली श्रीगणराज प्रभूंची उपासना, त्या त्या देवतांच्या भक्तांनी वर्णन करणे हे असामान्य आहे. मात्र ते असे करतात कारण ते ख-या अर्थाने यथार्थवक्ता आहेत. सत्यवादी आहेत आणि सत्यता हीच आहे की मोरयाच या विश्वाचे अंतिम तत्व आहे तोच ओंकाररूप परब्रह्म आहे.

संतांनी या ओंकाररूप सकाळ कारणाला वंदन केले आहे.
अकार चरण युगुल! उकार उदर विशाल
मकारू महामंडल! मस्तकाकारे!
ही प. पु. माउलींची कथनी असो की
ओंकार प्रधान रूप गणेशाचे
जे तिन्ही देवांचे जन्मस्थान

हा जगदगुरु तुकोबारायांचा उदघोष असो. सर्वच श्रीगणराज प्रभूंच्या ओंकार रुपत्वाचाच विचार आधारस्थानी आहे.
तुम्ही म्हणाल मग शिवपार्वतीनंदन रूपाचे काय? तर श्रीसमर्थ रामदास स्वामी सुस्पस्ट कथन करतात.

जयावरी लटीकाची आळ आला
जो माया गौरी पासोनी जाहला
झालाची नाही त्या अरुपाला
रुप कैसे?

विविध संतांनी केलेल्या अशा गणेशवंदनेला यथार्थरीत्या अभ्यासण्याचे कार्यच येथून पुढच्या लेखांमधून करूयात.

!! जय गणेश !!

श्री ज्ञानदेवांची गणेशवंदना

ओम नमोजी आद्या! वेदप्रतिपाद्या!
जय जय स्वसंवेद्या! आत्मरुपा!
देवा तुची गणेशु! सकलार्थमती प्रकाशु!
म्हणे निवृतीदासू! अवधारिजो जी!

वेद वेदान्तांनी ओंकार रूप आद्यतत्व परब्रह्म परमात्मरुपात ज्या स्वसंवेद्य आत्मतत्वाचे वर्णन केले ते परब्रह्म तत्वच श्री गणेश रुपात उपास्य आहे ते आत्मचैतन्यच सगळ्यांच्या बुद्धीला अर्थ दाखविणारे बुद्धीपती तत्व आहे. हे निवृत्तीदास प. पु. माऊली अवधारण करायला सांगत आहेत.

" अवधारिजो जी " ही शब्दरचना मोठी गोड आहे. संस्कृतची उपसर्ग लावून धातूच्या अर्थाला अलंकृत करण्याची रीती माऊली मराठीत वापरते. अवधारण करणे म्हणजे दृढरीत्या धारण करणे, पक्के ध्यानी घेणे, नीट समजून घेणे, मनी बसविणे काय? तर हे ओंकाररूप परब्रह्मच श्रीगणेश आहे. श्रीगणेशांचे हेच वास्तवरूप आहे. स्वरूप आहे. "देवा तूची गणेशु" ही माऊलींची परमशास्त्रीय स्पष्टोक्ती आहे. त्या ब्रह्मणस्पतींचे सगळ्या संतांनी ग्रंथारंभी आरंभवंदन केले आहे.

आपल्या डोक्यातील शिवपुत्र ही कल्पना ज्ञानदेवांना कुठेच मान्य नाही. उलट भगवान श्रीशंकरांना श्रीगणेश वंदन करताना दाखवून मोरयाच्या परब्रह्मत्वालाच त्यांनी अधोरेखित केले.
माऊलीचेच शब्द सांगायचे तर त्रिगुण त्रिपुरी वेढिला! जीवत्वदुर्गी आडिला तो आत्मा शंभूने सोडविला! तुझिया स्मृती! १७/२ त्रिपुरासुर वध ही भगवान श्री शंकरांची सर्वात महत्वपूर्ण लीला. त्यावेळी श्रीशंकर श्रीगणेशाराधान करतात हे प्रत्यक्ष शिवपुराणातच वर्णन केले आहे. त्याच श्री आदिनाथांपासून आरंभ झालेल्या परंपरेचे वहन करणारी माऊली त्याच परमसत्य भूमिकेला अधोरेखित करते.
प.पु. माऊली त्या कथानकाचा आधार तर घेतेच पण केवळ कथे पुरता विचार न करता त्यातील अध्यात्मिक गुढार्थही उलगडून दाखविला आहे. त्रिपुरासूर कोण? तर जीवच तो त्रिगुण रुपी तीन पुरात अडकतो. तीन देह हेच त्याचे त्रिपुर असतात. त्यातून सोडवणार ते भगवान श्रीशिव शिव शब्दाचा अर्थच आहे पवित्र. शंकर शब्दाचा अर्थच आहे कल्याणकरणारा वेगळ्या शब्दात श्रीशिव म्हणजेच ज्ञान.

त्रीगुणरुपातील त्रिपुरात अडकलेल्या जीवाची मुक्ती केवळ आणि केवळ ज्ञानानेच संभव आहे. ते ज्ञान ज्या परमचैतन्याच्या अधिष्ठानावर प्रगटते ते आहे श्रीगणराज प्रभू. म्हणूनच माऊली शब्दरचना करते.

तो आत्मा शंभूने सोडविला! तुझिया स्मृती श्रीशिव आपली सर्वोच्च लीला श्रीगणेश स्मरण पूर्वक करतात. अन्य सकल देवतांमध्ये सर्वोच्च आहेत श्री शंकर. म्हणूनच तर बाकी देव आहेत आणि हे महादेव आहेत. ते महादेव आपली महानलीला "श्रीगणेश स्मृतीने युक्त होऊन करतात" या विधानाचा व्यापक अर्थ हाच आहे की अन्य सकल देवतांच्या सकल लीलांच्या अधिष्ठान रुपात असणारे शुध्द चैतन्य आहेत "भगवान श्रीगणेश".

श्रीशंकर आपल्या कार्यापूर्वी श्रीगणेश वंदन करतात ती केवळ लोकरूढी आहे एवढाच भाग नाही. आपणच दिलेल्या आशीर्वादाचा तो मान ठेवलाय असेही नाही. तर माउलींच्या मते श्रीगणेशच सर्वोच्च आहेत. अतुलनीय आहेत. ते अत्यंत सुस्पष्ट शब्दात लिहितात की -
म्हणोनी शिवेसि कांटाळा गुरुत्वे तूंची आगळा! १७/३ अर्थात श्रीशंकरांसोबत जर मोरयाचा कांटाळा अर्थात तुलना केली तर गुरुत्वे अर्थात मोठे पणाने तूच आगळा म्हणजे वैशिष्टपूर्ण ठरशील. आणखी किती स्पष्ट सांगायचे? श्रीशंकर आणि श्रीगणराजांची तुलना करता श्रीगणेश हेच श्रेष्ठ ठरतात. ही एक ओवी मोरयाचे वैभव सांगण्यास पुरेशी आहे.

प.पु. माऊलींच्या लेखी मोरयाचे हेच वास्तवरूप आहे. ते सांगताना ते एक खंत ही मांडतात कोणती खंत? तर सामान्य जनांना हे गणराजाचे मुळरूप कळतच नाही. हे यथार्थ रूप न जाणून घेता ते गतानुगतिक रीत्या श्रीगणेशांना शिवपुत्र, पार्वती नंदन, शिवगण प्रमुख इतकेच समजतात. अशा अशास्त्रीय धारणा युक्तांना माऊली थेट "मूढ" म्हणतात.

जे तुझ्याविखी मूढ
तया लागी तू वक्रतुंड
ज्ञानियासी तरी अखंड
उजुची आहासी! १७/४ प.पु. माऊली म्हणत आहे की जे मूढ लोक मोरयाच्या या वास्तवरुपाला जाणत नाहीत त्यांचासाठी मोरया वक्रतुंड आहे.

तुंड म्हणजे तोंड. मुख. आपले मुख ही आपली ओळख असते. मोरया वक्रतुंड आहे म्हणजे काय तर त्यांची ओळखच सामान्यांना होत नाही. ते चुकीच्या, अयोग्य, वक्र रूपातच मोरयाला ओळखतात. शिवपुत्र आदी मानतात म्हणून इतरांसाठी श्रीगणेश वक्रतुंड आहेत. मात्र ज्ञानवतांसाठी ते कायम सरळच आहेत. कसे आहे ते सरळ रूप. तर ओंकार रूप.

ओंकार = परब्रह्म = श्रीगणेश हेच वास्तव आहे.

अशा परब्रह्म गणराजांचे आरंभवंदन करतात श्रीज्ञाननाथ. कसे? पुढच्या चतुर्थीला पाहू.
जय गजानन!

श्री ज्ञानदेवकृत गणेशवंदना २

माऊली ज्ञानदेवांनी केलेल्या गणेश वंदनेला अनेकानेक पैलू आहेत. (त्यापैकी `विविध महत्वपूर्ण बाबींना आपण यथाकाळ समजून घेऊच.) पण माऊलींच्या श्रीगणेश वंदनातील सर्वोपरी सुंदरतम ओवी कोणती? तर ---
तैसे प्रयाग होते सामरस्याचे!
वरी वोसान तरत सात्विकाचे!
ते संवाद चतुष्पथीचे
गणेश झाले! (१०/१२४)
केवळ शब्दार्थरीत्या, वरपांगी पाहता या ओवीचे वाच्यार्थ दोन भक्तांच्या भेटीचे हे वर्णन आहे. मात्र शांतपणे पाहता लक्षात येईल की हे संभवच नाही. दोन भक्तांची भेट हा "वदतो व्याघात" आहे 'दोन भक्त' ही शब्दरचनाच शास्त्र दृष्टया संभव नाही. भगवंताशी एकरूप म्हटल्यावर ते परस्परांशीही एकरूपच की.
मग काय आहे या ओवीचा नेमका अर्थ? तर ही ओवी गाणपत्य संप्रदायाच्या परिभाषेत समजून घ्यायला हवी. तरच जिचा नेमका अर्थ कळू शकेल.

या ओवीत तीन महत्वाची सूत्रे आहेत.

१) सामरस्याचे प्रयाग २) सात्विकाचे वोसान ३) चतुष्पथांचे संवाद. या तीनही संकल्पना श्रीमुदगल पुराणानुसार आपले एक वेगळेच अर्थ धारण करतात.
प्रथम आहे सामरस्य प्रयाग. प्रयाग म्हणजे त्रिवेणीसंगम गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांचा संगम. पण येथे केवळ जलप्रवाहाचे एकीकरण इतका सामान्य अर्थ नाही. कारण प्रयागालाही खरे तर दोनच प्रवाह दृश्य आहेत. मग काय आहे त्रिवेणी?

तीन हा शब्द आध्यात्मिक क्षेत्रात गुणांसाठीयोजिला जातो. त्या त्रिगुणांचा संदर्भ येथे अभिप्रेत आहे. यातील तमोगुण म्हणजे यमुना. काळेपणा, जडपणा इ. तमोगुणांची वैशिष्टे. यमुनेचे पाणी देखील तसेच काळे आहे. गंगा म्हणजे रजोगुण ऐकायला जरासे विचित्र वाटते. पण गंगेच्या गमन शिलतेचा संबंध रजोगुणाच्या कृतीप्रधानतेशी आहे म्हणून गंगा रजोगुण. तर तिसरी सरस्वती सत्वगुण. का? तर ती अदृश्य आहे.

तमोगुणाचे आलस्य आणि रजोगुणाचे क्रीयाशिलत्व दृश्य असते मात्र सत्वगुणाची परिणती असणारी शांती, समाधान, आनंद हा अनुभूतीचा भाग आहे. दृश्यत्वाचा नाही.

या तीनही गुणांचे एकत्रीकरण होते ते प्रयाग. या सगळ्या विश्वालाच प्रयाग म्हणतात.

दुस-या टप्प्यावर विचार आहे सात्विकाचे वोसान. वोसान म्हणजे कचरा. सत्वगुणाला कचरा म्हणणे सामान्यवाचकास अजब वाटेल. पण आध्यात्म शास्त्रात सत्वगुणासही त्याज्यच मानले आहे कारण शेवटी तो ही गुणंच आहे. त्याची युक्तताही 'सगुण' कारीच आहे.
अशा तीनही 'सगुण' त्व वृत्तिच्या प्रवाहाचे एकत्रीकरण प्रयाग. मात्र या प्रयागावर आहे. तीर्थ हे चवथे निर्गुणत्व. सगुणत्वाचे तीनप्रवाह तथा शांतस्वरूप चवथे तीर्थ या चार मार्गांना माऊली चतुष्पथ म्हणते. अध्यात्माचे हे चार मार्ग आहेत. या चारही मार्गांचा संवाद व्हायला हवा.
या चार मार्गांना गाणपत्य संप्रदायात आणखी एका वेगळ्या रुपात मांडले आहे. या चार मार्गांना चार देवतारुपात, चार तत्वरुपात मांडले आहे. असत, सत, सम आणि नेती अशा परिभाषेत या टप्प्यांना वर्णिले आहे. या चार ला चार 'ब्रह्म' म्हणतात.

असत ब्रह्म अर्थात हे जड जगत. जड देह. जस असला तरी त्याची एक क्षमता आहे सत्ता आहे. शक्ती आहे. याच कारणाने या स्तराला देवता भाषेत शक्तिब्रह्म म्हणतात.
या देहाला चालविणारे 'देही' रूप चैतन्य सत ब्रह्म. जडाच्या तुलनेत त्याचे अस्तित्व अधिक संपन्न, अत:ते सत या चैतन्याच्या प्रकाशात जडाचे प्रदर्शन घडत असल्याने या प्रकाशदायी तत्वास सुर्यब्रह्म म्हणतात.

या दोन्हीच्या समन्वयास म्हणतात सम ब्रह्म. कारण हे दोन्ही समानच आहेत. देह विनाशीच आहे आणि 'देही' पण हे देह सापेक्ष असल्याने त्या अर्थाने तोही सापेक्षरीत्या विनाशीच आहे. या दोन्हीच्या पार असणारे चैतन्य, ते दोन्हीत समान असल्याने त्यास समब्रह्म म्हणतात. ही चैतन्यावस्था परमव्यापक असल्याने तिला विष्णू ब्रह्म असे म्हणतात.

जड, तमोमय असत ब्रह्म, चैतन्यमय रजोगुणीसत ब्रह्म आणि दोन्हीचा पार वा दोन्हींना व्यापून असणारे सत्वगुणी समब्रह्म यांचे एकत्रीकरण म्हणजे प्रयाग. येथे 'सामरस्य' होते कारण हे तीनही गुणच. त्या समानत्तेच्या आधारे ते तीन एकत्र येतात.

अशा या एकत्रीकरणात सत्वगुण सगळ्यात श्रेष्ठ म्हणून तो वर असणे देखिल तरंगणे आहे आणि हे तरंगणे प्रवाहाशी संबंधित असल्याने माऊली रोसानाचा विचार करते.
या तीनही गुणांचे प्रवाहित्व एका जागी 'शांत' झाले की त्या कुंड रूप, तीर्थरूप अवस्थेला नेती ब्रह्म म्हणतात. प्रवाह नाही, दृश्यता नाही या अर्थाने ते नेती. शांत या अर्थाने स्थाणु. प्रवाहाची गतिशीलता नाही. ही शांत अवस्थाच अत्यंत पवित्र अतः ते शिवब्रह्म अन्य तीन गुण आणि त्या तिघांच्याही गतिशीलता स्थिर झाल्यावर गुणातीत असे ते शिवब्रह्म हे चार पंथ होत.

या चारी मार्गांच्या एकत्रीकरणास माऊली 'संवाद चतुष्पथीचे!' म्हणतात. असा संवाद झाला की त्या संवादासच माऊली 'गणेश' म्हणतात.
अर्थात सगुण आणि निर्गुण अशा दोन्हीचे एकत्रीकरण म्हणजे श्रीगणेश. सगुण निर्गुणाची एकवाक्यता म्हणजे श्रीगणेश याच कारणाने श्रीसमर्थही म्हणतात.

गणाधीश जो ईश सर्वागुणांचा
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा!

सगुण शरीर आणि निर्गुण मस्तकाचे समन्वयरूप आहे माझा मोरया
माऊली आरंभवंदन करते ते अशा परब्रह्म गणराजाचे. श्रीगुरू अशाच गणराजाचा उपदेश करतात.
म्हणूनच तर माऊली म्हणते
तुमचा अनुग्रहो गणेशु!'
कसे? ते पुढील लेखात पाहू तोवर
जय गजानन!

ओम नमो जी आद्या! (श्री ज्ञानदेव कृत गणेशवंदना- भाग ३)

ओम नमो जी आद्या!
वेदप्रतिपाद्या
जय जय स्वसंवेद्या
आत्मरुपा!
महाविष्णूचा अवतार भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या भावार्थ दीपिकेच्या आरंभी मंगलाचरण साधत आहेत. भारतीय संस्कृतीचे अंतिम गंतव्यरूप ओंकाराचेच आद्यवंदन. तोच आदी तोच अंत. वर्तुळाचे हेच वैभव आहे. आरंभ बिंदूच जसा त्याचा अंतिम बिंदू असतो तशीच रचना या संसारचक्राची आहे. या संसाराचा आरंभबिंदू आहे. संसारांश असलेल्या आपल्या सगळ्यांचे अंतिम साध्य आहे ओंकार. माऊली त्या परमआद्यतत्वरूप ओंकाराचा जयघोष करत आहेत.

तो ओंकार आद्य तत्व आहे. आद्य आहे या शब्दातच अनादी आहे हे गृहीत आहे सगळ्यांचे परमकारण असणा-या तत्त्वालाच 'आद्या' शब्द शोभतो. त्याच्या आधी कोणीच नाही. त्याचा निर्माता कोणीही नाही. तोच सर्वांचा आरंभ आहे.

वेद, वेदांत, पुराणे, शास्त्रे सगळे काही केवळ आणि केवळ त्या एकटया ओंकाराचेच वर्णन करतात. याच कारणाने भगवान श्रीवेदव्यासांची वरपांगी विचित्र वाटणारी उक्ती आहे.

अष्टादश पुराणेषु एकस्यही वै वर्णनम! अर्थात अठराही पुराणांमध्ये केवळ एकटयाचेच वर्णन आहे. वरपांगी तर तसे दिसत नाही भागवतात श्रीहरी, शिवपुराणात श्रीशंकर तर अन्यान्य पुराणात अन्यान्य देवता प्रधान वाटतात. मग श्रीव्यास असे कसे म्हणतात? तर त्याचे सरळ, साधेसोपे समाधान एकच आहे की तो म्हणजे 'ओंकार' सर्वत्र केवळ आणि केवळ एकटया ओंकाराचेच वर्णन आहे. अन्य कोण्या देवतेचे वाटत असले तरी ते अंशरूप आहेत.

शास्त्रकार वर्णन करतात-
अकारो वासुदेवस्यात! उकारस्तु महेश्वर:!
मकार: सुर्यइत्युक्त:! शक्तीनादात्मिका मता!
ओंकारात साडेतीन मात्रा आहेत. 'अ', 'उ' आणि 'म' या तीन मात्रा आणि अर्धमात्रारूप नाद.
या पैकी 'अ' म्हणजे श्रीहरी, 'उ' म्हणजे श्रीमहेश्वर-शिव, 'म' म्हणजे सूर्य आणि नाद म्हणजे आदिशक्ती भगवती जगदंबा. ही मांडणी विविध शास्त्रात विविध रुपात स्वीकारली आहे, स्पष्ट केली आहे. उदा. जगदंबेच्या महानतम ग्रंथरूप श्रीदुर्गासप्तशतीतील तिचे वर्णन पहा-
'अर्धमात्रा स्थितानित्या
यानुचार्या विशेषत:!
जगदंबा अर्धमात्रास्थित आहे हे शाक्तग्रंथही अधोरेखित करतात! थोडाफार संदर्भ बदलत जगदगुरु तुकोबारायही हीच भूमिका मांडतात.
अकार तो ब्रह्मा! उकार तो विष्णू!
मकार महेश! मानियेला!
अर्थात सगळ्याच देवतांचे एकत्रीकरण म्हणजे ओंकार. मात्र या कथनात एक सूक्ष्म मेख आहे. सगळ्या देवता ओंकाराचे अंशरुप आहेत हे म्हटल्यामुळे एक वेगळा अर्थ ध्वनित होतो की त्या अंशरूपच आहेत. परिपूर्ण नाहीत.

आपल्यापेक्षा अगदी ग्रहणक्षत्रादिक देवताही श्रेष्ठ आहेत. त्या आपणास वंदनीय आहेत. इंद्रादिक त्यांच्याही पेक्षा श्रेष्ठ 'ईश्वर' आहेत तर विष्णू शंकरादिक 'महेश्वर' आहेत. त्यामुळे त्यांच्या परमश्रेष्ठत्वाचा परिपूर्ण आदर करूनही हे सत्य बदलत नाही की ते परात्पर ब्रह्म नाहीत. ते पूर्ण ओंकार रूप नाहीत. ते ओंकाराचे अंश रूपच आहेत. एकेका मात्रेचेच अधिकारी आहेत.
मग संपूर्ण ओंकाराचे एकत्रित वर्णन काही असूच शकत नाही का? पूर्ण ओंकार रूप दैवत कोणतेच नाही का? तर आहे. कोणते? तर माझा मोरया. म्हणूनच माऊली म्हणते-
देवा तूची गणेशु!
सकलार्थप्रती प्रकाशु!

म्हणे निवृत्तिदासु!
अवधारिजो जी!
यातील 'अवधारिजो जी!' ही शब्दकला मोठी सुंदर आहे. संस्कृतच्या उपसर्ग लावून धातूच्या अर्थाला अधिक सबल, दृढ करण्याच्या रीतीला माऊली उपयोजित आहे. त्यातही दृढ करण्याची रीती कशासाठी तर निश्चय करण्यासाठी. अर्थात दृढनिश्चय करा. पक्की खुबागाठ बांधा. निश्चितरीत्या समजून घ्या. नि:संशयरीत्या ध्यानी धरा. नि:शंकतेने जाणून घ्या म्हणजे 'अवधारिजो जी!' काय अवधारिजे? तर 'देवा तूची गणेशु!'
आद्य, वेदप्रतीपाद्य, स्वसंवेद्य ओंकार म्हणजेच श्रीगणेश. अष्टादश पुराणाचे एकमेव वर्ण्य तत्व श्रीगणेश. सकलशास्त्रांचे एकमेवाद्वितीय कथानीय श्रीगणेश.
श्रीगणेशांच्या या ओंकार रुपाला माऊली एका अलौकिक रीतीने आपल्या हृदयी सुस्थापित करते.
अकार चरणयुगुल! उकार उदार विशाल!
मकारू महामंडल! मस्तकाकारे!
अन्य महेश्वरांना ओंकाराच्या मात्रा रुपात वर्णिले. ते अंश, ओंकार अंशी अशी रचना पाहिली मात्र येथे ओंकाराच्या मात्रारूप अंशांना मोरयाचे अंगरूप वर्णिले. मात्रा या अंग आहेत तर अंगी रूप मोरया पूर्ण ओंकार ब्रह्म आहेत- देवा तूंचि गणेशु!

एखाद्या गाणपत्य उपासकाने हे वर्णन केले असते तर त्याला 'सांप्रदायिक अर्थवाद' रुपात आपण बोलवू शकलो असतो. पण महावैष्णव आणि आदिनाथ परंपरेचे पाईक माऊली जेव्हा हे वर्णन करते तेव्हा तो परमसत्यतेचा सिंहनाद आहे हे विशेषत्वाने लक्षात घ्यायला हवे.

या ओंकारालाच शास्त्र एकाक्षरब्रह्म म्हणते. शब्दब्रह्म म्हणते. एकदा मोरयाचे हे ओंकार रुपत्व नि:संशयरीत्या मनी ठसले की मग त्यांचे बाह्यरुपही असेच परमदिव्य वाटते.
याचसाठी माऊली म्हणते-
हे शब्दब्रह्म अशेष!
तेचि मूर्ती सुवेष!
मोरयाची मूर्ती शब्दब्रह्म आहे. अमुर्ततेत ओंकाररुपत्व विशद केल्यावर माऊली म्हणत आहे केवळ तात्विक पातळीवरच नाही तर मुर्तरुपातही मोरया असाच आहे.

मोरयाची 'मूर्ती' ही माऊलींच्या लेखी अशीच 'ज्ञानमय' आहे. कशी? पुढील लेखात पुढील चतुर्थीस. तोवर जय गणेश!

तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवितसे!' (श्रीज्ञानदेवांचे गणेश वंदन भाग ४)

भगवान श्रीगणेशांच्या ओंकार स्वरूप निर्गुण निराकार स्वरूपाचा ठाम विचार मांडल्यावर कनवाळू माऊली श्रींच्या सगुण साकार रूपाचा विचार करते सर्वसामान्य साधकांना समोर सगुण साकार आलंबन असल्याशिवाय साधना करताच येत नाही. त्यांच्या याच मर्यादेचे भान ठेवन माऊलीचे मातृहृदय अवतरीत होते आणि निर्गुणत्वाला विशद केल्यावर साधना सुलभतेसाठी त्याच निर्गुणाचे सगुण रूप शब्दबद्ध करते.

मात्र हे सगुन वर्णन सामान्य नाही. आपल्या सारखे नाक, कान, डोळ्यांचे बाह्य वर्णन नाही. वर्णन तर सगुणाचे आहे. मात्र ते करत असतानाही निर्गुणत्वाला धक्का लागत नाही. 'मूर्तीचे' वर्णन तर घडते पण 'अमूर्ताला' किंचित ही अवकळा येत नाही याला म्हणतात माऊलींचे वर्णन. आपल्या या वर्णनारंभी माऊली म्हणते-

हे शब्दब्रह्म अशेष! तेची मूर्ती सुवेष!
तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवीत असे!

माऊलींच्या लेखी अशेष 'शब्दब्रह्म' हीच मोरयाची मूर्ती आहे. शब्दब्रह्म म्हणजे वेद, उपनिषदे, पुराणे, शास्त्रे या सगळ्यांना श्रींचे शरीर म्हटले. का? तर शरीर हे दृश्य असते. मूर्त असते, तसे वेदातील शब्द दृश्य आहेत. शब्द दृश्य असतात पण ते दिसत असले तरी महत्व कशाला असते? तर अर्थाला. अर्थ कळला तर शब्दांची गरजच नसते. नुसत्या वटारल्या डोळ्यांनी वा बोटांच्या हालचालीनेही आपण मनातील भावना पोहचवू शकतो. तेथे शब्दांची गरजच नसते. शब्दोच्चार न करू शकणारे बालकही हास्यातून स्वीकार वा रुदानातून नकार कळवतच असते की. तात्पर्य शब्द दिसत असले तरी महत्व आहे अर्थाला. तसे वेदादिकांचे शब्द आहेत शरीर. दिसते शरीर पण महत्व असते जीवाला. नदवत वेदादिक शास्त्रांच्या अध्ययनात महत्व आहे मोरयाला जाणण्याला. त्या जाणण्याचा मार्ग आहे वेद. अत: ते शरीर.

कसे आहेत हे शब्द? तर- निर्दोष. अदोष मोरयाचे शरीरही निर्दोषच हवे. हे शब्द निर्दोष आहेत. हे वर्णन मोठे चिंतनीय आहे. बोलणे आले की बोलणारा आलाच. शब्द आले की उच्चारण कर्ता आलाच. असा कोणी वक्ता आला की मग त्याचे गुणदोषही आलेच. त्याची बौद्धिक मर्यादाही आलीच. त्याच्या स्वार्थभावाची अनिवार्यताही आलीच. पण या शब्दात तसे नाही.
व्यावहारिक वचनातील हे दोष वेदवचनांना लागू पडत नाहीत. कारण आपली वचने हे पुरुषाचे म्हणून पौरुषेय असतात पण वेदवचन अपौरुषेय आहे. अत: त्यात व्यक्तिगत दोषांना स्थान नाही. ते निर्दोष आहेत. कारण ते 'परमसत्य' आहेत.

'ऋतं वच्मि! सत्यं वच्मि!' ही प्रतिज्ञा असणारी शास्त्रवाणी ही श्रीगणराज प्रभूंची 'मूर्ती' आहे. एखाद्याच्या चित्राकडे पाहिले की आपल्याला 'त्या' ची आठवण येते. कारण चित्र मूर्ती हे 'त्या' चे दिग्दर्शन करीत असते. त्याप्रमाणे वेदवाड.मय माझ्या मोरयाचेच कथन करतात म्हणून ते 'वपु' रूप ठरतात. सामान्य व्यक्तीचे कथनार्थ सामान्य घटक चालतात पण वर्णन परब्रह्माचे निदर्शन करते ते ही 'शब्दब्रह्मच'.

'शब्दब्रह्म' असणारी वेदवाणी हेच श्रीगणराजांचे शरीर होय. मोरयाची ही वपु मिरवत आहे. 'मिरवणे' शब्दही मोठा सुंदर आहे. 'मिरवणूक' काढण्यात हे मिरवणे असते. आपण मोरयाची मिरवणूक काढतो अर्थात त्याच्या सौंदर्याचे, वैभवाचे, ऐश्वर्याचे, क्षमतांचे भव्यतम प्रदर्शन करतो. विविध प्रकारे श्रींच्या मूर्तीला रथाला, समूहाला इतकेच काय मार्गालाही सजवत असतो.

मात्र थोडा विचार करा या सगळ्या सजावटीची गरज कोणासाठी? श्रींसाठी की आपल्यासाठी? तर निर्विवाद रीत्या आपल्याच साठी या सगळ्याच्या 'असण्या' वा 'नसण्या' चा मोरयाला काहीच फरक पडत नाही. मात्र या सगळ्याच्या द्वारे आपल्या मनात त्याची प्रीती अधिकाधिक दृढ होते.
हाच हिशोब आहे मोरयाच्या शब्दरूप शरीराचा. त्या शरीराने वर्णिलेल्या सगळ्या वैभवाचे आपणास विलोभन घडते. त्याचसाठी ही वर्णवपु 'मिरवत' असते.

अर्थात हे मिरवणेही सामान्य भौतिक अलंकाराचे नाही. जसे शरीर दिव्य तसेच त्यांचे अलंकारही दिव्यच. काय आहेत हे अलंकार? माऊलींचे शब्द आहेत-

हे शब्दब्रह्म अशेष! तेचि मूर्ती सुवेष!
तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवत असे!
स्मृती तेचि अवयव! देखा आंगिकभाव!
तेथ लावण्याची ठेव! अर्थशोभा!
अष्टादश पुराणे! तेचि मणिभूषणे!
पदपद्धती खेवणे! प्रमेय रत्नांची!
पदबंध नागर! तेचि रंगाथिले अंबर!
जेथ साहित्यवाणे सपूर उजाळाचे!
देखा काव्य नाटक! जे निर्धारिता स कौतुक!
त्याची रूणक्षुणनी क्षुद्रघंटिका अर्थध्वनी!
नाना प्रेमयांची परी! निपुणपणे पाहता कुसरी!
दिसती उचित पदे माझारी रात्नेभली!
तेथे व्यासादिकांची मती! तेचि मेखला मिरविती!
चोखाळपणे झळकती! पल्लव सडका!

काय अदभूत वर्णन आहे हे, स्मृती हेच अवयव, अर्थशोभा हे लावण्य पुराणे ही मणिभूषणे, पदपद्धती रत्नांचे कोंदण, शब्दरचना हे वस्त्र, काव्यनाटके इ. क्षुद्रघंटिका इथपासून तर व्यासादिकांची मती ही कंबरपट्टा.

प्रत्येक कथनाला समजून घ्यायला एकेक लेखही अपुरा पडावा असे हे कथन. कां म्हटले असेल या सगळ्यांना अशी आभूषणे? काय काय साम्य आहे त्यांच्या संरचनेत. पुढील लेखात अभ्यासू. तोवर जय गणेश!

# मोरयाची अवयव शोभा!

(माऊलींचे गणेश वर्णन- पुढे सुरु)

शब्द ब्रह्मालाच श्रीगणेशांचे मूर्त रूप म्हणून मांडल्यावर भगवंतांचे समस्त अवयव रुपात माऊली विविध शास्त्र पद्धतींचे निरुपण करीत आहेत.

स्मृती तेची अवयव! देखा अंगिकभाव!

तेथ लावण्याची ठेव! अर्थशोभा!

स्मृती ह्याच भगवंताच्या अवयव आहेत. अनेकार्थाने ही संगती समजून घ्यायला हवी. स्मृतीचा संबंध कृतीशी आहे. कृतीची नियमावली रूपातच 'स्मृती' निर्माण झाल्या. त्या स्मृती मोरयाच्या अवयव आहेत. कारण कृतीचा संबंध अवयवांशी आहे.

यात 'अर्थशोभा' हे लावण्या होय. अवयवांचे खरे सौंदर्य त्यांच्या केवळ रेखीव असण्यात नाही. म्हातारपणीही नाक-डोळे तसेच रेखीव असतात. पण त्यातील आकर्षकता लोप पावते. 'लावण्य' ही वेगळी गोष्ट आहे. ती अंतरंग वैभवाची गोष्ट आहे.

श्रुतीस्मृतीतील 'अर्थ' हाच लावण्य आहे. दृश्य असतात 'शब्द' मात्र ग्राह्य असतो अर्थ. स्मृतीतील श्रुतीतील 'अर्थ' महत्वाचा. येथे 'अर्थ' शब्दाचा भावार्थ आहे 'मिळवण्याची गोष्ट' पुरुषार्थ शब्दात 'अर्थ' शब्दाचा जो अर्थ अभिप्रेत असतो तोच येथे आहे. पुरुषार्थ म्हणजे पुरुषाने मिळविण्याच्या गोष्टी काय मिळवायचे? तर धर्म, अर्थ, काम, मोक्ष हेच पुरुषार्थ.

यांच्या प्राप्तीने जीवनात येणारी 'परमतृप्तता' हेच लावण्याचे स्वरूप आहे. हे मिळाले की माणूस तृप्त  होतो. काही मिळवायचे असले की येणारी चिंता लावण्याचा विनाश करते. भगवान 'आप्तकाम' असल्याने नित्य तृप्त असाणा-या भगवंताची 'लावण्यशोभा' याच कारणाने अखंड आहे.

मग अशा लावण्यमय स्मृती अवयवांना सुशोभीन करतात पुराणांची अवयव 'अलंकार' रचना पुराणांची संख्या अनेक तसे अलंकारही अनेक. अलंकार मुळच्या सौंदर्यास खुलवतात. तशी पुराणे श्रुतिस्मृती प्रतिपादित सिद्धांतानाच पोषक असतात अत: त्यांना अलंकार म्हणतात.

माऊली म्हणते-

अष्टादश पुराणे तिची मणिभूषणे!

पदपद्धती खेवणे प्रमेय रत्नांची!

अठराही पुराणे हेच अलंकार. त्यातील प्रमेये हीच रत्ने आणि पदपद्धती हेच कोंदण.

पुराणांचे प्रमेय स्वरूप परमात्म तत्वाचे विवेचन हे रत्नवत दैदीप्यमान आहे. ते 'कथनीय' आहे. महत्व रात्नालाच असते. कथांना नव्हे तर कथनीयाला महत्व असते. पुराण कथा 'कशा आहेत?' पेक्षा 'त्या तशा का आहेत?' याचा अभ्यास केला तरच पुराणकथांचा खरा उपयोग होऊ शकेल. अन्यथा त्या कथा निरुपयोगी, अजब, अत्कर्य वाटतात. रत्नाचेही असेच असते. हिरा तेव्हाच चमकतो जेव्हा त्याला पैलू पाडणारा रत्नपारखी हाताळतो. अन्यथा आपल्याला 'कोराहीरा' सापडला तर आपण त्याचे महत्वच  न कळल्याने फेकुनच देऊ. पुराणकथा अशाच असतात. त्यातील तात्पर्य कळले तरच त्याचे तेज प्रगटते. अन्यथा त्या भाकडकथा म्हणणा-या पारखहीनाचीच संख्या अधिक असते.

अशा रत्नांना सरळ धारण करता येत नाही. त्यासाठी त्यांना कोंदणात बसवावे लागते. पुराणांची 'पदपद्धती' अर्थात 'कथारूप मांडणी' हे कोंदण होय.

कोंदणाला पाहायचे नसते. पाहायचे असते 'रत्न' पण रत्न सरळ न गळ्यात घालता येते ना हातात. त्याला अंगठी व लॉकेट रुपी कोंदण अनिवार्य असते. कथांची मांडणी अशीच असते. कथा हे कोंदण आहे. 'कथनीय' हे रत्न तेच पाहायचे. पण कोंदणाशिवाय ते शक्य नाही. जसे तांदूळ पेरतांना साळीसकट पेरावे लागतात. ते उबवतातही साळीसकट पण साळीचे प्रयोजन तसे काही नसते. मात्र त्याच्या शिवाय तांदूळ उगवतही नाहीत. कथांची रचना तशीच असते. कथा लक्षात ठेवायला सोप्या असतात. मात्र लक्षात ठेवायचे असते ते 'कथनीय'.

मग माऊली म्हणते-

'पदबंध नागर तेचि रंगाथिले अंबर!'

शब्दांना माऊली वस्त्र म्हणते. शब्दालंकार इ. ना काव्यशरीर म्हणतात. तेच आरंभी दिसतात तसे शब्दच आधी दिसतात, प्रथमदर्शनी लक्ष वेधक शब्द-पद हेच अंबर म्हणजे वस्त्र होय.

देखा काव्य नाटका!

जे निर्धारिता स कौतुका!

त्याची रुणझुणती क्षुद्रघंटिका!

अर्थध्वनी!

काव्य, नाटक इ. साहित्यप्रकारांना माऊली क्षुद्रघंटिका म्हणतात. छोटी छोटी घुंगरे. वस्त्राला दागिन्यांना लावलेल्या या घंटिका जशा 'मनोल्हादक' वाजतात तसे हे साहित्यप्रकार मनाला आल्हादित करतात.

या सगळ्या वर्णनातील सगळ्यात सुंदर मांडणी म्हणजे-

तेथ व्यासादिकांची मती!

तेचि मेखला मिरवती!

भ. व्यासादिकांच्या बुद्धीला माऊली मेखला म्हणत आहे.

मेखला म्हणजे कंबरपट्टा. तो कमरेवर अर्थात शरीराच्या मध्यभागावर, अर्ध्याभागावर असतो. अर्थात व्यासादिकांची बुद्धीही मोरयाच्या या स्वरूपाच्या अर्ध्याभागावरच पोहचते.

केवळ सगुण, साकार रुपालाच ती गवसणी घालते. आळवते , आवळते अत: मेखला. अर्ध्या भागालाच का? तर सगुणत्वालाच गवसणी घालता येते. निर्गुणत्व हा वर्णनाचा नव्हे तर अनुभवाचा प्रान्त. तेथे बुद्धीचा आवाका नाही तर विलयच अपेक्षित आहे अतः बुद्धी बुद्धीपतीच्या मेखला रुपात मांडणे माऊलीची अनुपमेय रचना होय.

असा अलौकिक मोरया माऊलींनी शब्दबद्ध केला. माऊलींचा मोरया 'षडभूज' आहे. सहा हातांचा. त्या हातांचेही माऊलींनी केलेले वर्णन अद्भुत आहे. कसे? पुढील लेखात पाहू --------

जय गणेश!

श्री ज्ञानदेवांची गणेश वंदना!

श्री माऊलींची गणेशवंदनेतील विविध पैलू आपण पाहिले. या सगळ्या पैलूंचे सर्वोच्च शिखररूप कथन जर कोणते असेल तर ते म्हणजे माऊलींची ही एकमेव ओवी-

अकार चरण युगुल

उकार उदर विशाल

मकारू महामंडल

मस्तकाकारे!

श्री गणराज प्रभूंच्या ओंकार रुपाला इतक्या सुंदर शब्दात माऊली शिवाय कोण वर्णू शकेल? सगळ्या वेद, उपनिषद पुराण शस्त्रांचा एकमेव प्रतिपाद्य विषय कोणता? तर ओंकार ब्रह्म.

अष्टादश पुराणेषु एकस्यही वै वर्णनम अर्थात अठराही पुराणात एकाचेच वर्णन आहे असे श्रीव्यासमुनी स्वत:च सांगतात. मात्र लौकिकार्थाने तसे दिसत नाही. भागवतात श्रीविष्णू तर शिवपुराणात श्रीशंकराचे वर्णन दिसते. देवी भागवत जगदंबेचे वर्णन करते तर मार्कंडेय पुराणात वेगळेच वर्णन येते. मग अठराही पुराणात एकाचेच वर्णन कसे?

तर हे सर्व देव ज्या एकटया ओंकाराचे अंश आहेत त्या ओंकाराचे वर्णन. अन्य समस्त ईश्वर महेश्वरही ओंकाराचे अंशरूपच आहेत. ओंकारच या सगळ्यांचे मुळरूप त्या ओंकाराचेच

वर्णन आहे या सगळ्या रुपात. या एकेका अंशाचे वर्णन म्हणजे त्या ओंकाराच्याच एकेका अवयवाचे, भागाचे, अंशाचे वर्णन होय.

सगळ्याच संतांनी हे परमेश्वरांचे ओंकार अंशत्व वेगवेगळ्या रुपात वर्णिले आहे.

ज्ञानदेव रचिला पाया

तुका झालासे कळस'

ही वारकरी संप्रदायाची उभारणी. या पाया पासून कळसापर्यंत सगळ्यांना हे ओंकारत्व वर्ण्य विषय वाटते. जगदगुरु तुकोबाराय सुद्धा पंचेश्वरांचे ओंकार अंशत्व सांगताना म्हणतात-

अकार तो ब्रह्मा!

उकार तो विष्णू!

मकार महेश!

मानियेला!

ऐसा तिन्ही देव

जेथुनी उत्पन्न

तो हा गजानन

वंदियेला!

अकार, उकार आणि मकार या तीन मात्रांनी ओंकार सिद्ध होतो. तुकोबाराय या तीन मात्रांना तीन परमेश्वर रुपात सांगतात. अर्थात हे तीन देव ओंकाराच्या एकेका मात्रेचे अधिकारी आहेत. पण मग सगळा ओंकार एकाच स्थानी कोण? तर माझा मोरया.

कारण माऊलींनी ओंकाराच्या या तीन मात्रांना मोरयाचे अवयव रुपात वर्णिले. अन्य परमेश्वर अंशरूप आहेत ओंकार अंशी आहे. तर ओंकार मात्रा मोरयाचे अवयव आहेत. अवयवी आहे मोरया.

या अवयवांची कथनीही मोठी सुंदर आहे. अकार चरण युगुल. अकार मात्रा ही चरण आहे. तुकोबांच्या शब्दात अकार म्हणजे ब्रह्मदेव. श्रीब्रह्मदेव हे रजोगुणाचे. चरणाचे कार्य आहे भ्रमण हा रजोगुणाचाच भाग. चंचलता हालचाल हा रजोगुणाचा स्थाईभाव. अत: निर्मितीचे अधिकारी श्रीब्रह्मदेव ज्या अकार मात्रेचे ती मात्रा मोरयाचे पाय.

उकार उदर विशाल. उकार हे मोरयाचे उदर आहे. तुकोबा उकार श्रीहरींना म्हणतात. उदराचे आणि श्रीविष्णूंचे कार्य समान आहे. श्रीविष्णूंचे कार्य आहे पालनाचे. सृष्टीचे पालन संचालन श्रीहरी करतात. शरीराच्या बाबतीत पोटचे हेच कार्य आहे. पोट सगळ्या शरीराला उर्जा पुरविते. अर्थात सगळ्या शरीराचे पालन करते. त्या उर्जेवरच शरीर चालते. अर्थात पोटाच शरीराचे संचालन करते. अत: उदर म्हणजे श्रीहरी.

तर मकारू महामंडल मकार हेच भगवान गणेशांचे मस्तक आहे. जगदगुरुंच्या भाषेत श्रीशंकर  हे मकार रूप आहेत. श्रीशंकररूप मकार मोरयाचे मस्तक आहे. येथे शिव शब्दाचा वेगळा अर्थ अभिप्रेत आहे. शिव म्हणजे पवित्र. शंकर शब्दाचा अर्थच आहे. जो कल्याण करतो तो. कशाने होते कल्याण तर ज्ञानाने. अर्थात ज्ञान म्हणजेच श्रीशंकर. ते  ज्ञानच भगवान श्रीगणराजांचे मुखमंडल आहे. मुख म्हणजे ओळख. आपली ओळख पटते आपल्या मुखावरूनच. तशी गणराजप्रभूंची ओळख ज्ञानाशिवाय संभवच नाही. अत: मोरयाचे मुख आहे मकार. अशा रुपात ओंकाराच्या मात्रांना श्री गणराजप्रभूंचे अवयव दाखवत जणू माऊली सुस्पष्टरीत्या हेच समीकरण मांडते की.

ओंकार = ब्रह्म = श्रीगणेश

जय गणेश!